पंढरपूर नगरपरिषदेच्या हद्दीतील त्यांच्या मालकीची सिटी सर्व्हे नं ३५५८/अ/१ मधील १३९० चौ. फुट जागा श्री. दत्तात्रय रामचंद्र कोकणे यांना निवासी प्रयोजनासाठी हस्तांतरीत करण्यास शासन मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- न्यायाप्र-२०२२/प्र.क्र.१९/नवि-१८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- २४.०३.२०२३

**संदर्भ:-** १) नगरपरिषद, पंढरपूर सर्वसाधारण सभा ठराव क्र. ३१८, दि.०८.१२.१९९४
२) जिल्हाधिकारी, सोलापूर यांचे पत्र क्र. सावी/९/नपा/आरआर/एस४१५/७७७/२०१३, दि.१५.०३.२०१३
३) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट पिटीशन क्र. ८९६ / २०२१ मध्ये दि.२०.०१.२०२१ रोजी पारीत केलेले आदेश
४) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी अवमान याचिका क्र. ८ / २०२२ मध्ये दि.१२.०१.२०२२ रोजी पारीत केलेले आदेश
५) मुख्याधिकारी, नगरपरिषद पंढरपूर यांचे पत्र क्र.पंनप/नअ/१६४/२०२२,दि.१८.०१.२०२२

**प्रस्तावना:-**

पंढरपूर नगरपरिषदेच्या हद्दीतील श्री. दत्तात्रय रामचंद्र कोकणे यांच्या मालकीची सर्व्हे नं.३५५७ मधील १३९० चौ. फुट जागा छत्रपती संभाजी महाराज पुतळा व डिपी रोडसाठी नगरपरिषदेने ताब्यात घेतली होती. त्याबदल्यात नगरपरिषदेच्या मालकीची सिटी सर्व्हे नं.३५५८/अ/१ मधील १३९० चौ. फुट जागा यापुर्वीच नगरपरिषदेने सन १९८९ मध्ये करार करुन मुळ मालक श्री. दत्तात्रय रामचंद्र कोकणे यांच्या ताब्यात दिली आहे. दरम्यान सदर जागा अद्याप श्री. दत्तात्रय रामचंद्र कोकणे यांच्या नावे झाली नसल्याने त्यांनी मा. उच्च न्यायालयात दाखल केलेले रिट पिटीशन क्र. ८९६ / २०२१ मध्ये मा. न्यायालयाने दि.२०.०१.२०२१ रोजी पारीत केलेले आदेश तसेच मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडील अवमान याचिका क्र. ८ / २०२२ मध्ये मा. न्यायालयाने दि.१२.०१.२०२२ रोजी पारीत केलेले आदेश विचारात घेऊन सदर जागा महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम ९२ अंतर्गत श्री. कोकणे यांना हस्तांतरीत करण्यासाठी कार्योत्तर मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय-:**

पंढरपूर नगरपरिषदेच्या मालकीची सिटी सर्व्हे नं.३५५८/अ/१ मधील १३९० चौ.फुट जागा श्री. दत्तात्रय रामचंद्र कोकणे यांना हस्तांतरीत करण्यास नगरपरिषदेने दिनांक ०८.१२.१९९४ रोजी ठराव क्रमांक ३१८ सर्वानुमते मंजुर केला आहे. तसेच जागा हस्तांतरणासाठी जिल्हाधिकारी,

सोलापूर यांनी शासनास दिनांक १५.०३.२०१३ रोजी प्रस्ताव सादर केला आहे. सदर बाब विचारात घेऊन महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ च्या कलम ९२ (१) मधील तरतुदीनुसार शासनास असलेल्या अधिकारास अनुसरुन उपरोक्त १३९० चौ.फुट जागा श्री. दत्तात्रय रामचंद्र कोकणे यांना निवासी प्रयोजनासाठी हस्तांतरीत करण्यास खालील अटी/ शर्तीवर कार्योत्तर शासन मंजुरी देण्यात येत आहे:-

**अटी:-**

१) सदर जागेचा वापर महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ मधील तरतुदीनुसार अनुज्ञेय राहील.

२) नगरपरिषदेने त्यांच्याकडील आदेश क्र.बीपीए/००१६५/२०१७-१८/१३२, दिनांक १२.०१.२०१८ अन्वये दिलेल्या बांधकाम परवानगी मंजुरी आदेशामध्ये नमुद अटी/शर्ती कायम राहतील.

३) नगरपरिषदेच्या मालकीची जागा कब्जेहक्काने कायमस्वरुपी हस्तांतरीत करतांना महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ च्या कलम ९२ अंतर्गत शासन मंजुरी आवश्यक असतांना नगरपरिषदेने शासन मंजुरी न घेता जागा हस्तांतरीत केली आहे. ही बाब अधिनियमातील तरतुदीस अनुसरुन नाही. सबब यापुढे नगरपरिषदेने त्यांची स्थावर मालमत्ता हस्तांतरीत करतांना शासन मान्यता मिळाल्याशिवाय हस्तांतरीत करु नये, याची दक्षता घ्यावी.

४) या प्रकरणी जागा मालकास त्यांच्या मालकीची नगरपरिषदेने घेतलेल्या जागेच्या बदल्यात पर्यायी जागा देण्याची बाब असल्याने महाराष्ट्र नगरपालिका (स्थावर मालमत्तेचे हस्तांतरण) नियम १९८३ मधील नियम २६ नुसार नियम ४ व ७ मधील तरतुदी शिथील करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०३२४१७३६४११०२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ANIRUDDHA V JEWLIKAR
Date: 2023.03.27 14:04:40 +05'30'

**(अनिरुध्द व्यं. जेवळीकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई.
४. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
५. जिल्हाधिकारी, सोलापूर
६. मुख्याधिकारी, नगरपरिषद पंढरपूर जि. सोलापूर
७. निवडनस्ती (नवि-१८).